केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) करीता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता विभाग**
**शासन निर्णय क्र. कौविउ-२०२१/प्र.क्र.३२/प्रशा-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२२.

वाचा:- १. भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.No.१ (१३)/PFMS/FCD/२०२०, दिनांक २३ मार्च, २०२१.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दिनांक १ जुलै, २०२१.
३. कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांचे पत्र क्र.कौविरोवउिआ-९/मॉकसे/१८८०, दिनांक १८.०२.२०२२

**प्रस्तावना:-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधिन दिनांक २३ मार्च, २०२१ रोजीच्या आदेशान्वये सुधारीत कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी एका Single Nodal Agency (SNA) नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Bank Account उघडणे आवश्यक आहे. तसेच सदर केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उप सचिव दर्जाच्या अधिका-याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याबाबत निर्देशित केले आहे. त्यानुसार कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता विभागाच्या अंतर्गतच्या केंद्र पुरस्कृत योजनांकरीता Single Nodal Agency व Nodal Officer ची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता विभागांतर्गतच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमजबजावणी साठी पुढील प्रमाणे Single Nodal Agency आणि Nodal Officer नियुक्ती करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | विभागाचे नाव | Single Nodal Agency |
|---|---|---|
| १ | कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता आयुक्तालय, कोकण भवन, नवी मुंबई. | आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता आयुक्तालय |

२. कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता विभागांतर्गतच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमजबजावणीसाठी सहसचिव/उपसचिव (अर्थसंकल्प) यांची नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

३. केंद्र पुरस्कृत योजनांकरीता केंद्र शासनामार्फत दिनांक १ जुलै, २०२१ पासून सुधारीत कार्यपध्दतीनुसार निधी प्राप्त होणार आहे. त्यामुळे वरीलप्रमाणे नियुक्त Single Nodal Agency (SNA) यांनी केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) बाबत वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.२ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२२०३०३१११८२६२००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by Varsha Munja Bharose
Date: 2022.03.03 11:21:45 +05'30'

**( वर्षा भरोसे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता आयुक्तालय, नवी मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४. वित्त विभाग (व्यय-६/ अर्थसंकल्प-१८/कोषा प्रशा-४) मंत्रालय, मुंबई
५. नियोजन विभाग (कार्यासन १४७१), मंत्रालय, मुंबई
६. सहसचिव/उपसचिव, कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता, मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता, मंत्रालय, मुंबई.